**लिपिक वर्गीय कर्मचाऱ्यांच्या मागण्यांसंदर्भात अभ्यास करण्यासाठी गठीत समितीच्या शिफारशीनुसार, गट-क मधील पदोन्नतीचे स्तर कमी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: एसआरव्ही-२०१९/प्र.क्र.२३४ (भाग-१)/कार्या-१२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ मे, २०२२

**संदर्भ :-** सामान्य प्रशासन विभागाचा समक्रमांकाचा दि. ०७.०१.२०२१ चा शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

विविध प्रशासकीय विभागात लिपिक या गट-क मधील सर्वात निम्न पदावर नियुक्ती झाल्यानंतर प्रशासकीय विभागनिहाय वरिष्ठ पदावर पदोन्नतीसाठीच्या साखळीचे स्तर भिन्न भिन्न असल्यामुळे नियुक्तीनंतर वरिष्ठ पदावरील अधिकारी म्हणून पदोन्नती मिळण्यामध्ये समानता राहत नाही. यास्तव शासकीय कार्यालयातील लिपिक संवर्गास पदोन्नतीचे समान टप्पे निर्माण करावेत, अशी लिपिकवर्गीय कर्मचाऱ्यांची मागणी होती.

सदर मागणीच्या अनुषंगाने अभ्यास करून शासनास अहवाल सादर करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे समिती गठीत केली होती.

| | |
|---|---|
| १) अपर मुख्य सचिव, लेखा व कोषागारे, वित्त विभाग | - अध्यक्ष |
| २) उप सचिव (भा.प्र.से.), र.व.का., साप्रवि | -सदस्य |
| ३) उप सचिव (आ.पु.क.), वित्त विभाग | - सदस्य सचिव |

सदर समितीने आपला अहवाल सादर केला असून सदर अहवालातील शिफारशीनुसार कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे गठीत केलेल्या समितीने सादर केलेल्या अहवालात पुढीलप्रमाणे शिफारस केली आहे.

> "सर्वच प्रशासकीय विभागांमध्ये लिपिक संवर्गाचे पदनाम सारखे करून सर्व स्तरावरील पदनामाची रचना एकसारखी करणे, एकसारखी पदोन्नतीसाखळी व वेतनसंरचना विहित करणे शक्य होणार नाही. परंतु, संवर्ग व्यवस्थापनाच्या दृष्टीने तसेच पदोन्नतीच्या उचित संधी मिळण्याच्या दृष्टीने संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांची कामकाजाची, मनुष्यबळाची आणि प्रशासकीय संरचनेची गरज विचारात घेऊन स्वतंत्रपणे अभ्यासाअंती व सामान्य प्रशासन विभागाशी विचारविनिमय करून गट-क मधील संवर्ग संख्या/ पदोन्नतीचे स्तर कमी करण्याबाबत विचार करणे उचित होईल, असे समितीचे मत आहे."

वरील शिफारशीच्या अनुषंगाने, समितीने गट-क मधील संवर्ग संख्या/ पदोन्नतीचे स्तर कमी करताना पुढे नमूद केलेल्या बाबी विचारात घेण्यात याव्यात, असे सूचित केले आहे :-

१) संवर्गांची संख्या कमी करीत असताना त्याचा प्रशासकीय कामकाजावर आणि नागरिकांना पुरविण्यात येणाऱ्या सेवासुविधांवर प्रतिकूल परिणाम होणार नाहीत, याची दक्षता घेण्यात यावी.

२) प्रशासकीय कामकाज आणि त्यासाठी आवश्यक मनुष्यबळाची गरज विचारात घेण्यात यावी.

३) संवर्गांची संख्या कमी करताना दोन संवर्गाचे विलीनीकरण करण्याची गरज भासू शकते. अशा प्रकरणी रिक्त पदे निरसित करून आर्थिक भार मर्यादेत ठेवण्याबाबत विचार करावा.

४) संवर्ग संख्या/ पदोन्नतीचे स्तर कमी झाल्यामुळे दैनंदिन कामे तसेच कर्तव्ये व जबाबदाऱ्यांचे फेरनियोजन करणे आवश्यक राहील.

५) विहित कार्यपध्दतीनुसार वित्त विभागाच्या सहमतीने प्रशासकीय विभागाच्या आकृतीबंधात आवश्यक ते बदल करणे आवश्यक राहील.

६) संवर्ग संख्या /पदोन्नतीचे स्तर कमी केल्यामुळे संविधानाच्या अनुच्छेद ३०९ नुसार विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमांत आणि सेवाप्रवेशोत्तर परीक्षा नियमांत सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने आवश्यक ते बदल करणे आवश्यक राहील.

७) संबंधित आस्थापनेचा पिरॅमिड योग्य राहील, याची काळजी घेण्यात यावी. म्हणजे पदोन्नती साखळीतील निम्न संवर्गातील (Feeder Cadre) पदसंख्या आणि पदोन्नतीच्या संवर्गातील पदसंख्या यांचे योग्य गुणोत्तर राखण्यात यावे.

समितीने केलेली शिफारस व समितीने सूचविलेले उपरोक्त मुद्दे विचारात घेऊन सर्व प्रशासकीय विभागांना पुढीलप्रमाणे सूचित करण्यात येत आहे :-

**“सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील शासकीय कार्यालयातील गट-क मधील कार्यरत असणाऱ्या सर्व संवर्गांचा आढावा घेऊन (उदा. कनिष्ठ लिपिक/लिपिक टंकलेखक, वरिष्ठ / प्रमुख लिपीक, सहायक अधीक्षक,अधीक्षक इ.) गट-क मध्ये जे निरनिराळे संवर्ग आहेत, त्यापैकी काही संवर्ग कमी करण्याचा विचार करण्यात यावा. जेणेकरून गट-क मधील पदोन्नतीचे स्तर कमी होतील. तरी याबाबत आढावा दि. ३१.०८.२०२२ पर्यंत पूर्ण करून याबाबतचा सुयोग्य प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेस्तव सादर करावा. सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेनंतर आकृतीबंध सुधारीत करण्याचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करून त्यांच्या सहमतीने आदेश निर्गमित करावेत.”**

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०५२३१७४५४२१६०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GEETA RAHUL KULKARNI

Digitally signed by GEETA RAHUL KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92D474843B842720200D1A10946D5FC9348B9450F867605A47D177207C9BD384, cn=GEETA RAHUL KULKARNI
Date: 2022.05.23 18:24:48 +05'30'

**( गीता कुलकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व जिल्हाधिकारी,

४. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख (संबंधित प्रशासकीय विभागामार्फत)

५. सामान्य प्रशासन विभाग/का. ३९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरिता),

६. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

७. निवड नस्ती कार्या-१२.